टर्न की सोल्यूशन प्रोव्हायडर्सची निवड करण्यासाठी मार्गदर्शक तत्वे विहित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक-सीओएम-१०९७/प्र क्र १०६/९७/३९,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २७ मे, १९९९

वाचा : १) समक्रमांकाचा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १ डिसेंबर १९९८,

**प्रस्तावना :**

संदर्भाधिन शासन निर्णयाव्दारे शासकीय कामकाजाचे संगणकीकरण करण्याबाबत कार्यप्रणाली विहित करण्यात आलेली आहे. संगणकीकरणासाठी शासकीय विभाग व कार्यालयांना ज्यांच्या सेवा उपलब्ध करुन घेता येतील अशा एकुण १५ (पंधरा) टर्नकी सोल्यूशन प्रोव्हायडर्सची नामावली व त्यांना अशा सेवांसाठी देय असलेले दर सदर शासन निर्णयाव्दारे निश्चित करण्यात आले आहेत. सदर निर्णयाच्या परिशिष्ट २ मधील परिच्छेद २.० मध्ये टर्न-की सोल्यूशन प्रोव्हायडर्सची निवड कशी करावी याबद्दल कार्यप्रणाली नेमून देण्यात आली आहे. विहित कार्यप्रणाली नुसार विभागांना नामावलीतील टर्न-की सोल्यूशन प्रोव्हायडर्स पैकी एकाची अथवा अनेकांची निवड थेट करता येते किंवा नामावलीतील एकापेक्षा अधिक कंपन्यांना निमंत्रित करुन त्यांच्या सेवांच्या उपयुक्ततेबद्दल तपासणी करुन एक किंवा अधिक कंपन्यांना निवडता येते. याबाबत शासनाकडे वेगवेगळ्या शिफारशी व सूचना प्राप्त झाल्या आहेत. या सूचनांवर उच्चाधिकार समितीच्या कार्यकारी समितीने दिनांक १मार्च १९९९ च्या बैठकीत विचार केला. सदर बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयाचे अनुषंगाने खालील आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**शासन निर्णय :-**

१. प्रशासकीय विभागांनी / विभाग प्रमुखांनी टी.एस.पी.ची निवड करण्याकरिता अधिका-यांची एक समिती संदर्भाधीन शासन निर्णयाच्या परिशिष्ट २ मधील परिच्छेद २.३ मध्ये उल्लेखिल्याप्रमाणे स्थापन करावी. वरील समितीने नामावलीतील कंपन्यांमधील त्यांच्या कामासाठी उपयुक्त असू शकतील अशा कंपन्यांची संक्षिप्त सूची (शॉर्टलिस्ट) तयार करावी. सदर सूचीत नामावलीतील किमान ४ कंपन्यांचा समावेश असावा व त्यात राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र (एन.आय.सी.) यांचा समावेश असावा. या शॉर्टलिस्ट केलेल्या कंपन्यांना पूर्वाभ्यास करण्यासाठी निमंत्रित करावे.

२. निमंत्रित कंपन्या असा पूर्वाभ्यास विनामूल्य करतील. अशा पूर्वाभ्यासाचे अहवाल प्राप्त झाल्यावर विभागप्रमुखांनी स्थापन केलेल्या समितीने संदर्भाधिन शासन निर्णयाच्या परिशिष्ट २ मधील परिच्छेद २.३ मध्ये विषद केल्याप्रमाणे संबंधित कंपन्यांबरोबर सविस्तर चर्चा करावी. पूर्वाभ्यास अहवालाची छाननी कंपन्यांचे प्रेझेन्टेशन, त्यांच्या बरोबरची चर्चा व कंपन्यांच्या क्षमतेची तपासणी केल्यावर समितीने या कंपन्यांपैकी ज्या कंपन्या सविस्तर कार्याभ्यास व सिस्टीम रिक्वायरमेंट स्पेसिफिकेशनचे काम करण्यास सक्षम आहेत अशा कंपन्यांपैकी एक किंवा आवश्यकते प्रमाणे अधिक कंपन्यांची टीएसपी म्हणून निवड करावी.



एच-430(5000-5-99) GR-20020418125545000-0104

३. क्षेत्रिय विभागप्रमुखांनी कंपनीच्या निवडीची प्रक्रिया पार पाडली तरीही अशा निवडीस मान्यता देण्याचे अधिकार प्रशासनिक विभागासच राहतील.

४. सविस्तर कार्याभ्यास व सिस्टिम रिक्वायरमेंट स्पेसिफिकेशनचे काम करीत असतांना राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्राने काही आज्ञावल्या तयार केल्या असतील तर त्यांचा वापर संगणकीकरणाच्या प्रकल्पाची अंमलबजावणी करतांना पूर्णपणे करण्यात येईल हे स्पष्ट करण्यात यावे.

वरील आज्ञावल्याच्या वापराबाबत राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र यांना कळवावे व अहवालात योग्य ती नोंद ठेवावी.

५. सर्व क्षेत्रिय कार्यालयांनी आपले प्रस्ताव प्रशासनिक विभागामार्फतच पाठवावेत.

६. संगणकीकरणाच्या प्रकल्पाच्या अंमलबजावणीची संदर्भाधिन शासन निर्णयाव्दारे विहित करण्यात आलेली कार्यपध्दती या निर्णयान्वये करण्यात येत असलेल्या सुधारणांसह जिल्हा परिषदांनाही लागू राहील.

७. यापूर्वी ज्या विभागांनी टर्न-की सोल्यूशन प्रोव्हायडर्सची निवड केली आहे त्यांना ह्या निर्णयाव्दारे करण्यात येणा-या सुधारणा लागू असणार नाहीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(राधेश्याम मोपलवार)
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई
* प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), मुंबई,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, / लेखाकोष भवन, वान्द्रे (पूर्व), मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार कार्यालये.
[illegible]
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन क्रमांक २५/२६), मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती (२ प्रती)
* पत्राने.

Margdarshak (TSP)

एच-430(5000-5-99)अ. GR-20020418125545000-0104